कंत्राटदारांना या संदर्भात अपात्रतेच्या कारणासंदर्भात काही शंका असल्यास त्यांना निविदा उघडण्यात अधिकाऱ्यांनी प्रत्यक्ष सुनावणी घेऊन शंका निरसन करावे. तसे अभिलेखात नमूद करावे. कंत्राटदारास याव्यतिरिक्त सा.बां.विभागाच्या मुख्य अभियंता, सचिव (रस्ते), सचिव (बांधकामे) व प्रधान सचिव (सा.बां.) यांच्याकडे त्यांची तक्रार असल्यास याबाबत (grievance redressed) तक्रार सादर करुन त्याबाबत सुधारीत निर्णय झाल्यावर व तो संकेतस्थळावर प्रसिध्द करुन अपात्र कंत्राटदारांना ई-मेल द्वारे कळवून नंतरच लिफाफा क्र.२ उघडण्यात येईल. वरील स्वरुपाची तरतूद निविदा प्रसिध्दी mahhhatender.in व निविदा प्रपत्रात (Tender Document) मध्ये करावी.

अशा रितीने आतापर्यन्तच्या निवड प्रक्रियेत संपूर्णपणे पारदर्शकता पाळण्यात आली आहे व निविदा प्रक्रिया विषयी कुणाचीही तक्रार नाही असे कार्यकारी अभियंता यांनी अभिलेखावर नमूद करुन सर्व/बहूसंख्य कंत्राटदाराच्या उपस्थितीत लिफाफा क्र.२ (निविदा दर विषयक लिफाफा) उघडण्यात यावा. कंत्राटदार उपस्थित नसतील तर कंत्राटदाराशी प्रत्यक्ष संपर्क साधून उपस्थित रहाण्यास सुचित करावे व शक्यतो त्यांच्या उपस्थितीतच लिफाफा क्र.२ उघडण्यात यावा. ई-निविदा कंत्राटदार ५ पेक्षा कमी असल्यास किमान २ कंत्राटदारांच्या उपस्थितीत लिफाफा क्र.२ उघडावा. ई निविदा कंत्राटदार संख्येने ५ पेक्षा जास्त असल्यास किमान ३ कंत्राटदारांच्या उपस्थितीत लिफाफा क्र. २ उघडावा जेणेकरुन कंत्राटदाराच्या समोरच त्यांचे प्राप्त झालेले देकार किती दराचे आहेत हे सर्वांना ज्ञात होईल. अशा कामकाज पध्दतीमुळे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्यांविषयी विनाकारण संशय घेतला जाणार नाही. काही कारणामुळे जर कंत्राटदार सूचना देऊन ही उपस्थित नसतील तर अन्य ३ साक्षीदारांसमोर निविदा उघडण्यात यावी.

४.२ मंडळ स्तरावर प्राप्त होणाऱ्या व उघडल्या जाणाऱ्या निविदांमध्ये निविदापूर्व बैठकीची तरतूद असते. अशा निविदा पूर्व बैठकीत जास्तीतजास्त कंत्राटदार उपस्थित राहून ते सार्वजनिक बांधकाम विभागाच्या निविदा मसूद्याविषयी मुद्दे उपस्थित करतील असे पहावे. जर निविदा विकत घेतलेल्या कंत्राटदाराचे (Prospective bidder) काही अभिवेदन निविदापूर्व बैठकीत नसेल तर तसे अभिवेदन त्याचेकडून लिखित स्वरुपात प्राप्त करुन घ्यावे व अभिलेखावर जतन करावे. अभिवेदनातील मुद्यांचे निराकरण किंवा कंत्राटदाराने उपस्थित केले मुद्दे, निविदेतील करावयाचा आवश्यक बदल हा सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने ४ दिवसांचे आत करण्यात यावा. सद्य:स्थितीत दृक्श्राव्य माध्यम, व्हिडीओ कॉन्फरन्सींग, इ मेल अशी सर्व संवादाची वेगवान साधने उपलब्ध आहेत. **यामुळे पत्रव्यवहारात वेळ वाया न घालवता या सर्व साधनांचा वापर करुन निविदाविषयी CSD तांतडीने मंजूर करुन घ्यावे व दोन दिवसांच्या कालावधीत Service provider संकेतस्थळावर अपलोड करण्यात यावेत. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी या प्रकरणी अनिवार्यता तपासून तत्संबंधीची कारणे अधोरेखित करुन जास्तीचा कालावधी मंजूर करावा. निविदा प्राप्त होईपर्यन्तच्या प्रक्रियेमध्ये कुठलीही तक्रार नाही असे प्रमाणपत्र निविदा भरणाऱ्या सर्व कंत्राटदारांकडून प्राप्त करुन घ्यावे. तद्नंतरच लिफाफा क्र.१ उघडावा. लिफाफा क्र.१ मधील सर्व कागदपत्रांची छाननी केल्यानंतर कंत्राटदाराच्या पात्र/ अपात्रतेविषयीचे निष्कर्ष हे निविदा संकेत स्थळ तसेच mahapwd.com वर प्रसिध्द करण्यात यावे. सर्व पात्र/अपात्र कंत्राटदारांना त्यांच्या पात्र/अपात्रतेबाबत अवगत करण्यात यावे. ५ दिवसामध्ये सर्व अपात्र कंत्राटदारांचे म्हणणे**

**अभिलेखावर ठेवून निराकरण करावे व ते वेबसाईटवर प्रसिध्द करावे व त्यानंतरच लिफाफा क्र.२ उघडावा.**

४.३ **एक निविदा (Single Tender) बाबत कार्यपध्दती:-** ई निविदा प्रणाली अंतर्गत संपूर्ण पारदर्शकता, योग्य स्पर्धा आणि शासनाच्या हितार्थ, निविदा स्विकृतीत एकच निविदा प्राप्त होणे शासनाच्या हिताचे नाही. त्यामुळे यापूर्वीच्या एकच निविदा प्राप्त झाली असल्याच्यासंदर्भातील सर्व शासन आदेश/सूचना/निर्णय अधिक्रमित करुन खालील आदेश निर्गमित करण्यात येत आहेत :-

"एकच निविदा (Single Tender) म्हणजे निविदा सूचना प्रसिध्द केल्यानंतर फक्त एकच निविदा प्राप्त झाली आहे किंवा बऱ्याच निविदा प्राप्त होऊनही तांत्रिक लिफाफा क्र.१ तपासतांना अन्य सर्व कंत्राटदार अपात्र ठरून फक्त एकच कंत्राटदार निविदेसाठी पात्र ठरले आहेत, अशा सर्व निविदा देकारांना एकच निविदा (Single Tender) म्हणून समजण्यात येईल. या सर्व एकच निविदा संदर्भात आदेशित करण्यात येते की, अशा प्राप्त झालेल्या निविदा, लिफाफा क्र.२ न उघडता तात्काळ फेटाळण्यात याव्यात व लगेचच नवीन निविदा मागविण्यात याव्यात. मात्र यासंदर्भात मूळ प्रारुप निविदेमध्ये कुठलाही बदल करु नये. मूळ प्रारुप निविदेमध्ये कुठलाही बदल न केल्यास नवीन केलेली मागणी ही द्वितीय मागणी समजण्यात येईल. अशा मागणीनंतर जर परत एकाकी निविदा प्राप्त झाल्यास अशा निविदांबाबत निविदा उघडून प्रचलित कार्यपध्दतीनुसार पुढील कार्यवाही करावी. अशा निविदेबाबत पुन:श्च फेरनिविदा मागविण्याची आवश्यकता नाही. प्रथम मागणीच्या वेळी दोनच निविदा प्राप्त झाल्यास तीन पात्र निविदा प्राप्त नाही म्हणून प्राप्त दोन निविदा नाकारण्यात येतात ही बाब CVC नियमास धरुन नाही. कालापव्यय होऊ नये व कामे वेळेवर व्हावीत यासाठी दोन पात्र निविदा प्राप्त झाल्यास त्या उघडण्यात याव्यात. प्रचलित दरसूचीपेक्षा जास्त दराची निविदा प्राप्त झाल्यास याबाबत लगतच्या वरिष्ठ स्तरावर पूर्ण समर्थनासह निविदा मंजूरीकरीता सादर करावी. जर या निविदा मान्य करण्यासारख्या नसतील तर त्या सक्षम स्तरावर रद्द करुन निविदा अटींची फेरतपासणी करावी व स्पर्धात्मक दर प्राप्त करण्यासाठी अटी शिथील करुन फेरनिविदा मागव्याव्यात."

एकच निविदा का प्राप्त होत आहेत याअनुषंगाने निविदेतील अटी व शर्तींचा अभ्यास करुन तसेच ज्या अंदाजपत्रकावर आधारित निविदा मागविण्यात आल्या आहेत, **त्या अंदाजपत्रकातील बाबींचा अभ्यास करुन व बाबींच्या दराविषयी खात्री करुन आवश्यक असल्यास संबंधित प्रादेशिक विभागाचे मुख्य अभियंता यांच्या मान्यतेने प्रारुप निविदा मसुद्यात आवश्यक तो बदल आणि कामाची गुणवत्ता व दर्जा खालावणार नाही याची खात्री करुन काही अटी शिथिल करण्याबाबत व अंदाजपत्रकीय किंमतीत वाढ दर पूनर्विलोकनामुळे होत असल्यास त्याबाबत मुख्य अभियंता यांनी निर्णय घ्यावा. मुख्य अभियंत्यांनी हा निर्णय अभिलेख्यावर ठेवावा.** तद्नंतर अशा बदलेल्या निविदेस प्रसिध्दी देऊन परत देकार मागविण्यात यावेत. असे देकार प्राप्त झाल्यानंतर परत प्रथम वेळेस एकाकी निविदा प्राप्त झाल्यास ती नाकारावी व दुसऱ्या वेळेस निविदा मागवावी. दुसऱ्या वेळेस एकच निविदा प्राप्त झाल्यास ती अंदाजित दरापर्यंत स्वीकारण्याचे अधिकार संबंधीत सक्षम समितीस राहतील. जास्त दराची निविदा सक्षम प्राधिकाऱ्याकडे मंजूरीसाठी सादर करावी.

या सूचनांप्रमाणेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावलीमध्ये आवश्यक ती सुधारणा करण्यात आली आहे असे समजावे.

४.४ ई-निविदा प्रणालीअंतर्गत प्रथम बोलीवेळी किमान तीन अथवा तीनपेक्षा जास्त निविदा भरल्याचे आढळल्यास ई-निविदा प्राधिकाऱ्याने निश्चित केलेल्या वेळी लिफाफा क्रमांक (१) (तांत्रिक लिफाफा) उघडावा. तांत्रिक लिफाफामार्फत कागदपत्रांची छाननी करुन फक्त एकच कंत्राटदार पात्र ठरला तर अशा कामांचा लिफाफा क्र.(२) न उघडता सदर निविदा फेटाळण्यात याव्यात व तात्काळ अल्प कालावधीची फेरनिविदा प्रसिध्द करण्यात यावी. तांत्रिक लिफाफा छाननीचा कालावधी ही दोन दिवस इतकाच मर्यादित राहील.

अतितातडीच्या कामांच्या निविदांच्या पहिल्या बोलीवेळी केवळ एकच पात्र निविदा प्राप्त झाल्यास अशी निविदा सत्वर फेटाळण्यात यावी व अल्प मुदतीत फेरनिविदा मागवावी. कालापव्यय टाळण्यासाठी या निविदा पूर्वी ज्या वृत्तपत्रात प्रसिध्द होत होत्या त्यांच्याकडे प्रसिध्दीस पाठवाव्यात व त्याच वेबसाईट वर प्रसिध्द कराव्यात. व्दितीय मागणीच्या वेळी १ किंवा अधिक निविदा प्राप्त झाल्यास त्या निविदा उघडून पुढील कार्यवाही करावी. सद्यस्थितीत निरनिराळ्या निविदांचे अवलोकन करता लिफाफा क्र.१ उघडण्यामध्ये किमान १५ ते ३० दिवस, निविदा उघडण्यामध्ये किमान एक ते दीड महिना आणि निविदा स्विकृती प्रस्ताव सक्षम स्तरावर सादर करण्यासाठी परत एक ते दिड महिन्याचा कालापव्यय झाल्याचे आढळून येत आहे. हा कालापव्यय टाळण्यासाठी निविदा प्रस्ताव सक्षम स्तरावर सत्वर सादर करावे. अशा प्राप्त निविदांबाबत निविदेतील प्राप्त होणारे दर स्पर्धात्मक वाटत नसल्यास निविदा उघडणाऱ्या अधिकाऱ्यांनी व स्विकारणाऱ्या सक्षम समितीने आलेला निम्नतम देकार (Lowest offer) सादर करणाऱ्या कंत्राटदाराबरोबर वाटाघाटी करुन दर कमी करण्याचा प्रयत्न करावा. शासन स्तरावरील निविदांसाठी मुख्य अभियंता यांनी वाटाघाटी कराव्यात. प्राप्त निविदा दर अंदाजपत्रकांपेक्षा जास्तीचे असल्यास व कंत्राटदार निविदेचे दर, कमी करण्यास तयार नसल्यास त्या फेटाळण्यात याव्यात व तांत्रिक मंजूरी दिलेल्या अंदाजपत्रकांचे पुनर्विलोकन करुन सक्षम प्राधिकाऱ्याने आवश्यकता असल्यास दरविषयक बाबींत दुरुस्ती करुन फेरनिविदा मागविण्यात याव्यात. सद्य:स्थितीत शासन स्तरावर प्राप्त निविदांमध्ये सर्व निविदा कमी दराच्या प्राप्त होत आहेत. त्यामुळे सर्व जिल्ह्यातील निविदाविषयीचा कल निविदा स्विकृत करणाऱ्या अधीक्षक अभियंता/मुख्य अभियंता यांनी अभिलिखित करावेत व त्यापेक्षा जास्त दराच्या निविदा प्राप्त होत असल्यास त्या स्विकृत करण्यापूर्वी संबंधित निम्नतम दर देकार कंत्राटदारांशी वाटाघाटी करुन निविदा दर वरील मर्यादेत आणण्याचा प्रयत्न करावा. असे शक्य न झाल्यास व संबंधित कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता यांना प्राप्त झालेले दर योग्य वाटत असल्यास तसे त्यांचे अभिवेदन अभिलेखावर ठेवण्यात यावे व तद्नंतर सक्षम प्राधिकाऱ्यानी अशा निविदा स्विकृत कराव्यात.

४.५ निविदांच्या तांत्रिक लिफाफा क्र.१ ची छाननी व मुल्यांकन करतांना निविदा उघडणाऱ्या अधिकाऱ्यांनी व निविदा पडताळणी समितीने घ्यावयाची दक्षता व तद्नुषंगाने सूचना :-

सध्याच्या प्रचलित पध्दतीत निविदा कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांच्या स्तरावर उघडल्या जातात व अश्या निविदांच्या तांत्रिक लिफाफा क्र.१ ची छाननी त्यांचे स्तरावर होऊन लिफाफा क्र.२ उघडणेबाबत निर्णयही कार्यकारी/अधीक्षक अभियंता घेतात. या पध्दतीत बदल करण्यात येत आहे व यापुढे, खाली परिच्छेद क्र <u>५.१.४</u> प्रमाणे नमूद केल्याप्रमाणे निविदा पडताळणी समितीकडून ह्या निविदांची पडताळणी होईल.

निविदा पडताळणी समितीने खालील प्रमाणे कामकाज करावे.

**४.५.१** निविदा उघडण्याची सुचना सर्व कंत्राटदारांना द्यावी व त्यांचे उपस्थितीतच निविदा उघडाव्यात. जर काही कंत्राटदारांना निविदा उघडण्याचे दिवशी उपस्थित रहाणे शक्य नसेल तर त्यांच्याकडून त्याबाबत लेखी विनंती अभिलेखावर ठेवावी. मात्र कोणत्याही परिस्थितीत बहूसंख्य कंत्राटदारांच्या उपस्थितीतच निविदा उघडाव्यात.

**४.५.२** निविदा पडताळणी समितीने निविदा उघडल्यानंतर त्यांनी निविदेची छाननी करुन यासाठी निविदेच्या पात्रते/अपात्रतेविषयी काही शंका निर्माण झाल्यास, विशेषत: खालील बाबींवर त्यांनी कत्राटदारांकडून स्पष्टीकरण मागविणे अनिवार्य राहील.

(१) नोंदणी विषयक कागदपत्रे

(२) पॉवर ऑफ ॲटर्नीबाबतची स्पष्टीकरणे

(३) बँक प्रतीभूती हमी मधील त्रुटी

(४) कंत्राटदाराने सादर केलेल्या तांत्रिक व आर्थिक विवरणात संदिग्धता व त्रुटी आढळत असल्यास त्याबाबत स्पष्टीकरण

(५) पुलाची लांबी व विनिर्देश, समान कामे, इमारतींची उंची व कामाचे गुणवत्ता निकष, रस्ते बांधकामातील कामांचे/बाबींचे परिमाण व शुल्क

(६) जॉइंट व्हेंच्यूअर (Joint Venture) असल्यास त्यासंबंधी करारनाम्यात त्रुटी असणे, प्रमाणित नसणे, करारनामा नोंदविलेला नसणे, भागीदाराचे शेअर नमूद नसणे

(७) आर्थिक ताळेबंद व विवरणातील त्रुटीबाबतचे स्पष्टीकरण

(८) तांत्रिक लिफाफ्यातील सादर केलेले प्रस्ताव/कागदपत्रातील अटी/शर्ती व पत्र व्यवहारातील संदिग्धता, अस्पष्टता इत्यादि.

याबाबत निविदा उघडणाऱ्या सक्षम अधिकाऱ्यांनी (कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता) संबंधीत कंत्राटदारास पात्र/अपात्र ठरविण्यापूर्वी त्यांचेबरोबर लिखित स्वरुपात पत्रव्यवहार करावा व कंत्राटदाराकडून लिखित स्वरुपात स्पष्टीकरण घेऊन ते पडताळावे. किरकोळ व महत्व नसलेल्या अटीमुळे निविदाकरास अपात्र करण्यात येऊ नये. अशा ठिकाणी कंत्राटदाराकडून लेखी स्पष्टीकरण घ्यावे व अटीनुसार दुरुस्त कागदपत्रे प्राप्त करुन समितीसमोर ठेवून त्याची छाननी करुन कंत्राटदाराच्या निविदा पात्रता/अपात्रतेविषयी निर्णय घ्यावा. याबाबतचे सर्व अभिलेख धारिकेत व संकेत स्थळावर ठेवावे व निविदा स्विकृतीसाठी सादर करण्याच्या प्रस्तावात या सर्व पडताळणी पध्दतीचा स्पष्ट उल्लेख करावा.

बऱ्याचदा एक निविदा उघडण्यावेळी पात्र असलेल्या कंत्राटदार दुसऱ्या निविदावेळी सुध्दा अपात्र ठरविण्यात येते. यात कदाचित कंत्राटदाराचे संगनमत (CARTEL FORMATION) होण्याची शक्यता नाकारता येत नाही. यास्तव ज्यांनी देशात/ राज्यात अथवा सा.बां.विभागात सक्षमपणे कामाच्या स्वरुपानुसार जसे की, इमारतीच्या कामासाठी इमारतीचे समतुल्य काम, पुलाच्या कामासाठी पुलाचे समतुल्य काम इत्यादी केले आहे अशा कंत्राटदारास निविदा किरकोळ कारणास्तव (जसे की, PTC, Machinery, आयकर कागदपत्रे, Similar work condition इ.) अपात्र करु नयेत. अश्या कंत्राटदारांनी त्यांची पुर्वीची कागदपत्रे उपलब्ध केल्यास ती पडताळून पात्र ठरविण्याबाबत कळवावे व आर्थिक लिफाफा क्र.२ उघडावा.

## ४.६ अंदापजत्रकीय दराच्या १० टक्क्यापेक्षा अधीक दराने कमी असलेल्या निविदा प्राप्त झाल्यास त्यांच्या स्विकृती संदर्भात सुधारीत मार्गदर्शक सूचना

**४.६.१.** निविदा प्रक्रियेमध्ये प्राप्त निम्नतम निविदेचा देकार निविदाधीन कामाच्या किंमतीपेक्षा दहा टक्क्या पेक्षा अधिक दराने कमी असेल तर संबंधित कंत्राटदाराकडून एवढया कमी दरात काम करण्याचे नियोजनाबाबत सविस्तर तपशील निविदा बोलाविणा-या अधिका-याने प्राप्त करुन घ्यावा. कंत्राटदाराने दिलेल्या तपशीलाच्या आधारे सदर काम निम्नतम देकाराच्या किंमतीत पूर्ण करता येणे शक्य असल्याची खात्री करुन घेण्यात यावी.

**४.६.२.** प्राप्त निम्नतम निविदेचा देकार निविदाधीन कामाच्या किमतीपेक्षा १० % पर्यंत कमी दरांचा असेल तर ठेकेदारांनी निविदाधीन किमतीच्या १% एवढया किमतीची बँकेची प्रतिपूर्ती हमी / तेवढ्या रकमेचा Demand Draft परफॉर्मन्स सिक्युरीटी म्हणून निविदेच्या लिफाफा क्र.२ मध्ये सादर करावी. तसेच (Scan करुन ई-निविदेसोबत सादर करावी.) (उदा. १% ते १०% कमी दर - १% रक्कम).

**४.६.३.** प्राप्त निम्नतम निविदेचा देकार निविदाधीन कामाच्या किमतीपेक्षा १०% पेक्षा जास्त दराने कमी असेल तर-

(अ) देकार १०% पेक्षा जेवढया जास्त दराने आहे तेवढया रकमेचा व वरील बाब-४.६.२ प्रमाणे बँकेची प्रतिपूर्ती हमी /DD निविदे सोबत लिफाफा क्रमांक २ मध्ये सादर करावी. (उदा. १४% कमी दर - १०% पर्यंत करीता - १% व (१४% - १०% ) -४% असे एकूण ५% ). ही रक्कम रुपये १०००/- पेक्षा कमी असल्यास किमान रुपये १०००/- (एक हजार) ची बँकेची प्रतिपूर्ती हमी DD सादर करणे अनिवार्य राहिल.

(ब) देकार १५% पेक्षा कमी दराचा असल्यास उर्वरित रकमेसाठी दोन पटीने रक्कम DD व्दारे सादर करणे अनिवार्य राहील. उदा.१९% कमी दर- (१९-१५= ४% x २= ८%)

**४.६.४** बँक प्रतिभूती हमी DD ही ऐच्छीक असावी. तसेच सदर रक्कम सध्या जमा करण्यात येणाऱ्या रकमेइतकी असावी.

**४.६.५** बँक प्रतिभूती हमी/ DD उपलब्ध करुन देणे/ बँकेची प्रतिभूती हमी परत करणे व इतर बाबींबाबत खालील प्रमाणे कार्यवाही करावी :-

(अ) बँक प्रतिभूती हमी / DD निविदा बोलाविणा-या कार्यकारी अभियंता याच्या नावे असावी.

(ब) बँक प्रतिभूती हमी / DD सरकारी/शेड्युल्ड तसेच सार्वजनिक क्षेत्रातील बँकेची असावी.

(क) बँक प्रतिभूती हमीची/DD ची मुदत कामाच्या दोष दायित्व कालावधीनंतर एक महिना कालावधीपर्यन्त असावी.

(ड) बँक प्रतिभूती हमीची / DD ची प्रत Scan करुन ई-निविदा भरताना ठेकेदारांनी अपलोड करावी.

(इ) बँक प्रतिभूती हमी / DD सिलबंद लिफाफ्यामधून कंत्रादारांनी निविदा स्विकृतीच्या दिनांकात कार्यकारी अभियंता यांच्या कार्यालयात जमा करावा. लिफाफ्यावर कामाचे नाव व निविदासूचना क्रमांक लिहिण्यात यावा.

(फ) निविदा उघडल्यावर लिफाफा क्र.१ मधील कागदपत्रांची पूर्तता न झाल्यास संबंधित कंत्राटदारांना त्यांच्या बँक प्रतीभूती हमीचे लिफाफे / DD कार्यकारी अभियंता यांनी निविदा उघडल्याच्या दिनांकापासून ७ दिवसांत परत करावेत.

(घ) लिफाफा क्र.१ मधील कागापत्रांची पूर्तता घेऊन ज्या कंत्राटदारांचे लिफाफा क्र.२ मधील देकार उघडण्यात येतील त्या मधील निम्नतम २ निविदाकारांचे बँकेची प्रतिभूती हमी लिफाफे / DD वगळता इतर कंत्राटदारांचे बँकेची प्रतिभूती हमी लिफाफे ३ दिवसांत परत करण्यात यावेत.

(च) निम्नतम निविदाकारांना कार्यारंभ आदेश दिल्यानंतर ३ दिवसांत क्र.२ चे निम्नतम निविदाकाराची बँकेची प्रतिभूती हमी / DD परत करण्यात यावी.

(छ) वरील पध्दतीमध्ये खोटी कागदपत्रे/ बँक प्रतिभूती हमी सादर करणा-या कंत्राटदारांची अनामत रक्कम (EMD) जप्त करण्यात यावी व संबंधीत कंत्राटदारांना काळ्या यादीत टाकावे. तसेच अशा काळ्या यादीत समाविष्ट केलेल्या कंत्राटदारांनी सादर केलेल्या निविदा उघडू नयेत.

**४.६.६.** कार्यकारी अभियंता यांनी निम्नतम निविदाकरांकडून प्राप्त बँक प्रतिभूती हमीची Demand Draft मुदत दोष दायित्व कालावधी नंतर एक महिन्यापर्यंत वाढवून घेतल्यानंतरच कार्यारंभ आदेश देण्याची कार्यवाही करावी.

**४.६.७.** काम समाधानकारकपणे पुर्ण झाल्यावर निविदेतील तरतुदींप्रमाणे ठेकेदारांकडून प्राप्त अतिरिक्त कामगिरी सुरक्षा ठेव रक्कम व बँक प्रतिभूती हमी ३ महिन्याच्या आत कंत्राटदारांना कार्यकारी अभियंता यांनी परत करावी.

**४.६.८ ई निविदा प्रस्ताव सादर करण्याचा स्तर पुढीलप्रमाणे असावा :-**

कालापव्यय टाळण्यासाठी कंत्राटदारांकडून प्राप्त झालेल्या ई निविदेचा प्रस्ताव सखोल छाननीअंती खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याकडे थेट सादर करण्यात यावा.

| अ.क्र. | कामाची किंमत | ई निविदा प्रस्ताव सादर करावयाचे संबंधित अधिकारी |
|---|---|---|
| १. | रु. ३ लक्ष ते १ कोटी | कार्यकारी अभियंता |
| २. | रु. १ कोटी ते २.५० कोटी | अधीक्षक अभियंता |
| ३. | रु. २.५० कोटी ते १५ कोटी | मुख्य अभियंता |
| ४. | रु. १५ कोटी व त्यावरील | शासन स्तरावर |

## ५. ई निविदा स्विकृती

शासनाच्या ई निविदा वेबसाईट, वेब पोर्टलवर प्रसिध्द झाल्यानंतर निविदेतील अटी व शर्तीमध्ये अंशत:ही बदल करण्यात येऊ नये. अशा बदलामुळे कंत्राटदार आणि सर्वसामान्य जनता यांच्यामध्ये शासनाच्या कार्यपध्दतीबाबत संशय निर्माण होतो. तसेच शासनाच्या विश्वासार्हतेला तडा पोचण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यामुळे ई निविदेतील आशय अथवा तारखेत बदल करावयाचे झाल्यास ते सक्षम प्राधिकाऱ्याच्या लिखित पूर्वपरवानगीनेच करण्यात यावेत. अशा मंजूरी प्रदान करतांना सदरबाबतचे पत्र व त्याची कारणेही ठळकपणे संबंधित वेबसाईट तसेच mahapwd.com वर ठळकपणे प्रसिध्द करण्यात यावे.

### ५.१.१ अतिरिक्त कामगिरी सुरक्षा ठेव रक्कम (Additional Performance Security Deposit) भरणे

कंत्राटदारांनी अंदाजपत्रकीय दराच्या १० टक्के पेक्षा कमी दर भरल्यास अतिरिक्त इसारा रक्कम/ कामगिरी सुरक्षा ठेव रकमेची बँक प्रतिभूती हमी निविदेसोबत सादर करण्याच्या सूचना दिल्या आहेत. निर्धारित रकमेपेक्षा कमी रकमेची बँक प्रतिभूती हमी सादर केल्यास अथवा आवश्यक बँक प्रतिभूती हमी सादरच न केल्यास सदर कंत्राटदाराची निविदा रदद करण्यात यावी.

Additional Performance Security Deposit ची रक्कम भरताना कंत्राटदाराची निविदा देकार दोन दशांशपर्यंत ग्राह्य धरुन (Rounded upto two decimal points) त्याप्रमाणे रक्कम परिगणीत करण्यात यावी.

Additional Performance Security Deposit ची रक्कम कोणत्याही राष्ट्रीयकृत बँकेच्या DD/FDR/BG स्वरुपात स्विकारण्यास हरकत नाही. कंत्राटदाराने लिफाफा क्र.१ व मध्ये लिफाफा क्र.२ मध्ये विहित नमुन्यात Additional Performance Security Deposit सादर केले असल्याचे शपथपत्र सादर करणे आवश्यक आहे.

कंत्राटदाराने समाधानकारकरित्या काम पूर्ण केल्यानंतर Additional Performance Security Deposit परत करण्यात यावे. कंत्राटदाराने समाधानकारकरित्या काम पूर्ण केले असल्याबाबत संबंधीत कार्यकारी अभियंता यांनी अभिलेखीत करावे. यासाठी कंत्राटदाराच्या स्वतंत्र मागणी अर्जाची आवश्यकता नाही.

L-१ व L-२ यांना वगळून अन्य कंत्राटदारांचे Additional Performance Security Deposit कामाचा आर्थिक लिफाफा क्र.२ उघडल्यावर त्वरीत परत करण्यात यावे. L-२ यांचे Additional Performance Security Deposit लिफाफा क्र.२ उघडल्यानंतर ३० कार्यालयीन दिवस अथवा L-१ यांना कार्यारंभ आदेश दिनांक यापैकी जे नंतर असेल त्या दिनांकाला परत करण्यात यावे.

### ५.१.२ निविदेच्या विधीग्राह्यता कालावधी - (Validity Period)

**निविदेतील कंत्राटदाराने भरलेल्या दरासाठी विधिग्राह्यता कालावधी कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता/मुख्य अभियंता/शासन यांच्या पातळीवरील निविदांसाठी अनुक्रमे ६० दिवस, ७५ दिवस, ९० दिवस व १२० दिवस असावा.**

**५.१.३ ई- निविदा उघडण्याची प्रक्रिया कार्यालयीन वेळेत करणे.** - ई-निविदा प्रक्रिया ही शासनाने मंजूर केलेल्या ऑनलाईन प्रणालीव्दारे प्रदर्शित करण्यात येते. सदर प्रक्रियामध्ये निविदा कार्यालयीन वेळेत न उघडणे, कंत्राटदाराचे अनुपस्थितीत उघडणे अशा तक्रारी होऊ नयेत म्हणून ज्या कंत्राटदारानी निविदा सादर केल्या आहेत अशा बहुसंख्य कंत्राटदारांसमोर निविदा उघडण्याची कार्यवाही करण्यात यावी व अशा निविदा कार्यालयीन वेळेतच उघडण्यात याव्यात. काही अपवादात्मक परिस्थितीत सदरच्या निविदा कार्यालयीन वेळेत उघडणे शक्य नसल्यास संबंधित निविदाधारकास आगाऊ सूचना देऊन अशा निविदा कार्यालयीन वेळेनंतर उघडण्यात याव्यात. कार्यालयीन वेळेनंतर निविदा उघडण्याच्या प्रक्रियेमध्ये संबंधित निविदाधारकारांची किंवा किमान २ स्वतंत्र व्यक्तींची उपस्थिती अनिवार्य राहिल. यामुळे निविदा उघडण्याच्या प्रक्रियेमध्ये पारदर्शकता राहिल.

### ५.१.४ निविदा पडताळणी समिती (Evaluation Committee)

**१) रु. १ कोटी पर्यंतच्या कामांसाठी**

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधीत कार्यकारी अभियंता | अध्यक्ष |
| २ | संबंधीत मंडळाचे सहाय्यक अधीक्षक अभियंता | सदस्य |
| ३ | संबंधीत विभागाचा उपकार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |

**२) रु. १ कोटी पेक्षा जास्त रकमेच्या ते रु.१०० कोटीपर्यंतच्या निविदांसाठी.**

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधीत अधीक्षक अभियंता | अध्यक्ष |
| २ | दक्षता व गुण नियंत्रण मंडळातील कार्यकारी अभियंता/ उपअभियंता व ते उपलब्ध नसल्यास संबंधीत मंडळाचे सहाय्यक अधीक्षक अभियंता | सदस्य |
| ३ | संबंधीत कार्यकारी अभियंता | सदस्य |
| ४ | संबंधीत विभागाचा उपकार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |

**३) रु.१०० कोटीपेक्षा जास्त रकमेच्या निविदांसाठी.**

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | अध्यक्ष |
| २ | अधीक्षक अभियंता | सदस्य |
| ३ | अधीक्षक अभियंता (दक्षता व गुण नियंत्रण मंडळ) | सदस्य |
| ४ | संबंधीत कार्यकारी अभियंता | सदस्य |
| ५ | संबंधीत विभागाचा उपकार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |

**संबंधीत विभागाचे लेखाधिकारी सर्व समितीचे सदस्य असतील व त्यांनी आर्थिक विश्लेषण पूर्णपणे तपासणे अनिवार्य राहील.**

### ५.१.५ निविदा स्विकृतीचे अधिकार

| | | |
|---|---|---|
| कार्यकारी अभियंता समिती | : | रु. १ कोटी पर्यंत रकमेच्या निविदा (EE, DE, DAO) |
| अधीक्षक अभियंता समिती | : | रु.१ कोटी पेक्षा जास्त ते रु.२.५० कोटी पर्यंत रकमेच्या निविदा (SE, EE, DAO) |
| मुख्य अभियंता समिती | : | रु.२.५० कोटी पेक्षा जास्त ते रु.१५.०० कोटी पर्यंत किमतीच्या निविदा. (CE, SE, SE VQCC, DAO) |

### ५.१.६ शासन स्तरावर निविदा स्विकृती संदर्भात अनुसरण्याच्या सुधारित मार्गदर्शक सूचना

(अ) रु.१५ कोटीं पेक्षा जास्त रकमेच्या निविदा शासनस्तरावर स्विकृत होतील.

(ब) रु. १५ कोटी पेक्षा जास्त ते ३० कोटी किंमती पर्यंतच्या. जास्त दराच्या निविदा अथवा स्विकृतीबाबत:-

**रस्ते व पूलांची कामे :**

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव (रस्ते) सा.बां.विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | सचिव (बांधकामे) सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | संबंधीत उपसचिव (रस्ते/इमारती) | सदस्य सचिव |

**इमारतींची कामे :**

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव (बांधकामे) सा.बां.विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | सचिव (रस्ते) सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | संबंधीत उपसचिव (रस्ते/इमारती) | सदस्य सचिव |

- निविदा स्विकृतीच्या प्रस्तावाबाबत आठवडयाच्या दर मंगळवारी अथवा सोयीच्या दिवशी आवश्यकतेनुसार समितीची बैठक आयोजित करण्यात येईल.
- सदर बैठकीत सर्व सदस्य निविदा स्विकृती प्रस्तावावर विचार विनिमय करुन निर्णय घेतील.
- सदर बैठकीत तपासणी करण्याबाबतची तपासणीसूची सोबत प्रपत्र - २ प्रमाणे जोडण्यात आली आहे.

**(क) रुपये ३० कोटीपेक्षा जास्त किंमतीच्या सर्व निविदा स्विकृतीबाबत**

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव , सा.बां.विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |

सदर समिती आवश्यक असल्यास अन्य अधिकाऱ्यांना आमंत्रित करेल व कमी/ जास्त दरांबाबत सर्वंकष विचार करुन निविदा स्विकृतीविषयी निर्णय घेईल.

**५.२ निविदा स्विकृती संदर्भातील कालमर्यादा :**

जाहिरात प्रसिध्द केल्या नंतर निविदा प्राप्त करुन घेणे, उघडणे, कागदपत्रांची पडताळणी करणे, प्राप्त तक्रारींचे निवारण करणे, मंजूर करणे व कंत्राटदारास कार्यारंभ देणे इत्यादी कार्यवाहीस वेळेचे बंधन असणे आवश्यक आहे. क्षेत्रीय अधिका-यांनी ही कार्यवाही खाली दिलेल्या तक्त्यानुसार पुर्ण करावी.

| अ.क्र. | कार्यवाही | कमाल निविदा व कालावधी (दिवसामध्ये) | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | रु.१ कोटी पर्यन्तच्या निविदा | रु. २.५ कोटी पर्यन्तच्या निविदा | रु. १५ कोटी पर्यन्तच्या निविदा | रु. १५ कोटी पेक्षा जास्त किंमतीच्या निविदा |
| १. | निविदा प्रसिध्द करुन वृत्तपत्रे प्राप्त करुन घेणे | ५ | ५ | ५ | ५ |
| २. | लिफाफा क्र.१ (तांत्रिक लिफाफा) उघडणे | प्रसिध्द केलेल्या निविदेतील वेळ व तारखे प्रमाणे. | | | |
| ३. | निविदा प्राप्त होणाचा किमान कालावधी SBD निविदासाठी | १५ | २५ | २५ | ४५ |
| ४. | निविदा पूर्व बैठकीचा दिनांक (निविदा प्रसिध्द झाल्यानंतर) | ५ | १० | १० | १० |
| ५. | CSD अपलोड करणे | ३ | ३ | ३ | ३ |
| ६. | लिफाफा क्र.१ ची समिती मार्फत पडताळणी करणे | ७ | १० | १० | १० |
| ७. | निविदाधारकाच्या उपस्थित मुद्यांचे निराकरण करणे व अंतिम पात्र निविदाधारकांची यादी करणे | ३ | ५ | १० | १० |
| ८. | लिफाफा क्र.२ (वित्तीय लिफाफा) उघडणे | ३ | ३ | ० | ० |
| ९. | निविदा मंजूरीचा प्रस्ताव तयार करुन सक्षम अधिका-याकडे मंजूरीसाठी सादर करणे. | ७ | ७ | ५ | ५ |
| १०. | निविदा मंजूरीची कार्यवाही करणे. | १२ | १२ | १२ | २७ |
| ११. | ठेकेदारास प्रतिपूर्ती रक्कम सादर करण्याचे पत्र पाठविणे | ५ | ५ | ५ | ५ |
| १२. | कंत्राटदाराने प्रतिपूर्ती रक्कम निर्धारित वेळेत न भरल्यास त्याची निविदा रद्द करुन द्वितीय निविदा धारकासमवेत शहानिशा करुन पुढील कार्यवाही करावी कालावधीत कोणताही --- वाढ देणार नाही. | १० | १० | १० | १० |
| | **एकुण** | **५५ दिवस** | **८५ दिवस** | **९५ दिवस** | **१२० दिवस** |

## ५.३ निविदा शुल्क :-

सर्व निविदा online प्रसिध्द करण्यात येत असल्याने निविदा शुल्क खालीलप्रमाणे आकारण्यात यावी.

| अ.क्र. | निविदा रक्कम | निविदा शुल्क |
|---|---|---|
| १ | रु. ३.०० लक्ष पर्यंत | रु.२०० + वस्तु व सेवा कर |
| २ | रु. ३ ते रु.५० लक्ष पर्यंत | रु.५०० + वस्तु व सेवा कर |
| ३ | रु. ५० लक्ष ते रु.२ कोटी पर्यंत | रु.१००० + वस्तु व सेवा कर |
| ४ | रु. २ कोटी ते रु.५ कोटी पर्यंत | रु.२००० + वस्तु व सेवा कर |
| ५ | रु. ५ कोटी ते रु.१०० कोटी पर्यंत | रु.३००० + वस्तु व सेवा कर |
| ६ | रु. १०० कोटी ते रु.५०० कोटी पर्यंत | रु.५००० + वस्तु व सेवा कर |
| ७ | रु. ५०० कोटी पेक्षा जास्त | रु.१०००० + वस्तु व सेवा कर |

## ५.४ वस्तु व सेवा कर (GST):-

१) **वस्तु व सेवा करासंबंधी कंत्राटदारांनी त्यापृष्ठयर्थ परिपूर्ण कागदपत्रे सादर केल्यानंतर कार्यकारी अभियंता यांनी** VAT/Excise **या बाबी आवश्यकतेनूसार वगळून देयकांची छाननी करुन ३० दिवसांमध्ये संबंधीत देयके कंत्राटदारास अदा करावीत.**

२) **राज्य दरसुचीमधील विविध बाबीचे दर हे वस्तू व सेवा कर वगळून असावेत. अंदाजपत्रके तयार करताना प्रचलित वस्तु व सेवा कर** Recupulation Sheet **मध्ये अंतर्भुत करावा.**

३) **कामांच्या निविदा वस्तु व सेवा कर वगळून अंदाजपत्रकाच्या किंमतीवर आधारित मागविण्यात याव्यात.**

## ५.५ यंत्रसामुग्री:-

१) **यंत्रसामुग्रीसाठी स्वतःच्या मालकीच्या जागेची अट टाकण्यात येऊ नये.**

२) **कामांसाठी नवीन यंत्रसामुग्रीचे आयुर्मान १५ वर्षे गृहीत धरण्यात यावे.**

३) **पहिल्या १० वर्षाकरीता अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) यांच्या योग्यता प्रमाणपत्राची आवश्यकता नाही.**

४) **१० वर्षानंतर प्रतिवर्षी अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) यांचे योग्यता प्रमाणपत्र आवश्यक राहील.**

५) **रु.१.५० कोटी रकमेच्या कामांसाठी तसेच सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांच्या कामांसाठी** Hot Mix Plant/Batch Mix Plant/Machinery **यांच्या मालकी हक्काबाबतची अट निविदेमध्ये समाविष्ट करण्यात येऊ नये. यासाठी स्वसाक्षांकित भाडे प्रमाणपत्राची अट टाकण्यात यावी.**

**६.** या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र शासन सार्वजनिक बांधकाम विभागाची नियम पुस्तिका सहावी आवृत्ती १९८४ आणि यापूर्वी निविदा विषयक निर्गमित करण्यात आलेल विविध शासन निर्णय/परिपत्रके हे अधिक्रमित करण्यात येत आहेत. महाराष्ट्र शासन सार्वजनिक बांधकाम नियम

पुस्तिकेतील संहितेमध्ये विहित कलमे यथावकाश सुधारित करुन प्रसिद्ध करण्यात येतील. या बाबतीतील निविदा विषयक अन्य शासन निर्णय/परिपत्रके यातील आदेश यामुळे आपोआपच रद्द होतील.

**७.** या शासन निर्णयाचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता सर्व संबंधित कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता स्वत: जातीने लक्ष घालून घ्यावी. अन्यथा संबंधित अधिकारी, कर्मचारी यांच्यावर निर्णयातील दिरंगाई बाबत शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल. तसेच Standard Bidding Document मध्ये कंत्राटदारास compensation देण्याची तरतूद आहे. क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी कंत्राटदारास compensation देण्याची बाब उद्भवू नये याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१७५३०६०४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2018.09.27 18:07:42 +05'30'

**( सचिन चिवटे)**

**अवर सचिव (इमारती), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
६. सार्वजनिक बांधकाम विभाग/वित्त विभाग/ग्राम विकास विभाग
७. महालेखापाल-१, मुंबई
८. महालेखापाल-२, नागपूर
९. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई/नागपूर
१०.प्रत, महासंचालक, माहिती व प्रसिध्दी महासंचालनालय, मुंबई यांना प्रसिध्दीसाठी
११.प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,
१२.सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, (विद्युतसह)
१३.मुख्य वास्तुशास्त्रज्ञ , सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१४.संचालक, उद्याने व उपवने, मुंबई
१५.सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग, (विद्युत / यांत्रिकी)
१६.अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
१७.मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई
१८. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सा.बां.वि.,मंत्रालय, मुंबई
१९.कार्यासन इमारती-२ (निवड नस्ती)